गोपनीय

अन्वेषण, चौकशी किंवा फौजदारी गुन्ह्याबाबतचा खटला प्रलंबित असलेल्या शासकीय सेवकाच्या प्रकरणाचे पुनर्विलोकन.

**महाराष्ट्र शासन,**

सामान्य प्रशासन विभाग,

शासन निर्णय, क्रमांक सीडीआर-1393/प्र.क्र.72/11-अ,

मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 14 डिसेंबर 1995.

शासन निर्णयः- विभागीय चौकशी किंवा न्यायालयीन खटला प्रलंबित असलेल्या निलंबनाधीन शासकीय सेवकास त्याचे निलंबन समाप्त करून शासन सेवेत पुनःस्थापित करावे काय, निलंबनाखालील शासकीय सेवकाचे निलंबन किती काळ चालू ठेवावे, निलंबित शासकीय सेवकास शासन सेवेत पुनःस्थापित करून अकार्यकारी पदावर त्याची पदस्थापना करावी काय असे विविध प्रश्न नेहमी उपस्थित होत असतात.

निलंबित शासकीय सेवकाच्या विविध प्रश्नासंदर्भात सखोल अभ्यास केल्यानंतर निलंबित शासकीय सेवकास पुनःस्थापित करण्याच्या प्रश्नासंदर्भात खालीलप्रमाणे स्पष्टीकरण करण्यात येत आहेः-

"बेहिशोबी मालमत्ता, नैतिक अधःपतन, खून, खुनाचा प्रयत्न, बलात्कार अशा अत्यंत गंभीर प्रकरणांमध्ये जेव्हा शासकीय सेवकास निलंबित केले जाते, तसेच लाचलुचपत प्रतिबंधक विभागाने रचलेल्या सापळ्यामध्ये शासकीय सेवक जेव्हा मुद्देमालासह प्रत्यक्ष लाच घेताना सापडतो व त्यामुळे त्याला निलंबित केले जाते अशा प्रकरणांमध्ये शासकीय सेवकाविरुध्दचे न्यायालयातील फौजदारी प्रकरण पूर्ण होऊन अंतिम निर्णय लागेपर्यन्त त्यास सर्वसाधारणपणे निलंबितच ठेवण्यात यावे. त्याचे निलंबन संपुष्टात न आणता त्याचेविरुध्दच्या न्यायालयीन प्रकरणामधील अंतिम निर्णयाची वाट पहावी. अशा निलंबनाधीन शासकीय सेवकास अंतिम निर्णयाआधीच शासन सेवेत पुनःस्थापित केल्यास कार्यालयीन शिस्तीचा भंग होईल व शासनाच्या भ्रष्टाचाराची पाळेमुळे खणून काढण्याच्या धोरणास धक्का पोहोचेल याची जाणीव प्रत्येक शिस्तभंगविषयक प्राधिका-याने ठेवणे आवश्यक आहे."

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

रा.द.कासार,
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव;
मुख्य मंत्र्यांचे सचिव;
उपमुख्यमंत्र्यांचे सचिव;
सर्व मंत्री/राज्यमंत्री ह्यांचे खाजगी सचिव;
* प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई;
* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई;
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई;
सर्व प्रादेशिक विशेष अधिकारी, विभागीय चौकशा;
सर्व जिल्हा चौकशी अधिकारी, विभागीय चौकशा;
सर्व मंत्रालयीन विभाग;
सर्व विभाग प्रमुख;
सर्व कार्यालय प्रमुख.

* पत्राने.

--------